**विशेष कार्य अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग या पदाच्या पदनामात बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस २०१६/प्र.क्र.२१४/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १६ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :- शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस २०१६/प्र.क्र.२१४/५-स दि.३० मे २०१६

**प्रस्तावना:-**

सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागातील मंत्रालयीन स्तरावर यापुर्वी सहकार खात्यातील कामकाजाचे ज्ञान असणा-या क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांची विशेष कार्य अधिकारी या पदावर बदलीने नियुक्ती करण्यात येत होती. तथापी विभागाच्या (खुद्द) दि.२८/०८/२०१४ च्या आकृतीबंधात सदर पदाचा समावेश नव्हता. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग दि.२६/०९/२०१६ अन्वये अशा स्वरुपाची आकृतीबंधात समाविष्ट नसलेली विशेष कार्य अधिकारी ची पदे रद्द करण्यात आली आहेत. तथापी मंत्रालयीन पातळीवर सहकार कायद्याशी व निबंधकांच्या अधिकार कक्षेतील प्रकरणे तपासुन त्याबाबत धोरण ठरविणे इ. विशेष ज्ञानाशी संबंधित कामकाज हाताळताना क्षेत्रिय स्तरावरील किमान सहनिबंधक दर्जाचे अधिकारी असावेत या दृष्टीने विशेष कार्य अधिकारी पद रद्द झाले असले तरी सहनिबंधक पदाची सेवा शासनास उपलब्ध असण्याच्या दृष्टीने प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आला होता. मंत्रालयीन संवर्गाचे नियंत्रण सामान्य प्रशासन विभागाकडे असल्याने, सामान्य प्रशासन विभागाने विभागाच्या प्रस्तावास सहमती दर्शवुन अवर सचिव या समान श्रेणीतील पदावर सह निबंधकाचीं पदस्थापना करण्यास सहमती दर्शविली आहे.

उपरोक्त वाचा येथील दि.३० मे २०१६ च्या शासन निर्णयातील बदली आदेशातील अ.क्र.५ येथील श्री.आर.एस.शिंगटे,सहनिबंधक तथा नोडल अधिकारी, महाराष्ट्र राज्य कृषी स्पर्धाक्षम विकास प्रकल्प,पुणे यांची विशेष कार्य अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई येथे बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. तथापी उपरोक्त नमूद परिस्थितीत सदर पदाचे पदनाम बदलण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

श्री.आर.एस.शिंगटे हे सहनिबंधक सहकारी संस्था (रु.१५,६००-३९,१०० + ग्रेड वेतन रु.६,६००/-) या संवर्गात कार्यरत असुन त्यांची वेतनश्रेणी मंत्रालयीन अवर सचिव संवर्गाशी समकक्ष आहे. त्यामुळे सदर पदाचे, श्री.आर.एस.शिंगटे यांची सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई येथे पदस्थापना असेपर्यंत सदर पदाचे नामनिधान आता अवर सचिव असे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२१७१४४९३३१८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Gaikwad

Digitally signed by Nitin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, serialNumber=2276ac762af372d872c2f01d5bb5086166f4a6e20a1bdf9762d556a93f5d118e, cn=Nitin Gaikwad
Date: 2017.02.17 14:51:53 +05'30'

(नितिन गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे

२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण व प्रशासन).
६. सर्व जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था/सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक,सहकारी संस्था.
७.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई /नागपुर (लेखापरीक्षा /लेखाअनुज्ञेयता).
८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९.संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.खाजगी सचिव, मा.मुख्यमंत्री /मा.मंत्री (सहकार,पणन व वस्त्रोद्योग).
११.खाजगी सचिव मा.राज्यमंत्री (सहकार/ पणन/ वस्त्रोद्योग).
१२.अपर मुख्य सचिव, (सहकार/ पणन) /प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
१३.सर्व सहसचिव /उपसचिव /अवर सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१४.निवड नस्ती (कार्यासन-५स).